सन २०२१-२२ या वर्षात राष्ट्रीय कृषी विकास योजना- रफ्तार (RKVY-RAFTAR) अंतर्गत रु.१५० कोटी निधीचा कृषी यांत्रिकीकरण प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयांयो-०८२१/ प्र.क्र.१४२/१४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०८ सप्टेंबर, २०२१

**संदर्भ:-**

१. राष्ट्रीय कृषी विकास योजनेच्या राज्य स्तरीय मान्यता समितीच्या दि. १० मे, २०२१ च्या बैठकीचे इतिवृत्त, पत्र क्र. आरकेव्हीवाय-०१२०/प्र.क्र.१४/१४-अे दि.५ जुलै, २०२१.
२. केंद्र शासनाच्या कृषी व शेतकरी कल्याण मंत्रालय, कृषी व शेतकरी कल्याण विभागाचे पत्र क्र.१-१५/२०२१/RKVY, दि. १२ ऑगस्ट, २०२१

**प्रस्तावना-**

शेतकऱ्यांच्या उत्पन्नामध्ये वाढ करण्यासाठी तसेच कृषी क्षेत्रामध्ये उर्जा वापर वाढविण्यासाठी, केंद्र पुरस्कृत कृषी यांत्रिकीकरण उप अभियान राज्यात राबविण्यात येत आहे. याशिवाय, विविध केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत जसे, राष्ट्रीय गळीतधान्य, तेलबिया व तेलताड अभियान, राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान व राष्ट्रीय फलोत्पादन अभियान या अंतर्गत सुद्धा कृषी यांत्रिकीकरण घटकासाठी काही प्रमाणात निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. असे असले तरी शेतकऱ्यांच्या मागणीच्या प्रमाणात यांत्रिकीकरणासाठी पुरेसा निधी उपलब्ध होत नाही. या बाबी विचारात घेऊन RKVY-RAFTAR मधून सुद्धा कृषी यांत्रिकीकरणासाठी निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. दि. १० मे, २०२१ रोजी आयोजित बैठकीत, राष्ट्रीय कृषी विकास योजनेच्या राज्य स्तरीय मान्यता समितीने (SLSC), सन २०२१-२२ या वर्षात RKVY-RAFTAR अंतर्गत कृषी यांत्रिकीकरणाच्या रु.१५० कोटी रकमेच्या प्रकल्पास मान्यता दिली.

RKVY-RAFTAR अंतर्गत रु.१५० कोटीचा कृषी यांत्रिकीकरण प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

१. सन २०२१-२२ या वर्षात RKVY-RAFTAR अंतर्गत रु.१५० कोटी (अक्षरी: रु. दिडशे कोटी) निधीचा कृषि यांत्रिकीकरण प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.
२. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी कृषी यांत्रिकीकरण उपअभियानाच्या मागदर्शक सूचनांनूसार करण्यात यावी. तथापि, RKVY-RAFTAR अंतर्गत मंजूर प्रकल्पामधून केवळ कृषि यंत्र व औजारांच्या खरेदी करीता अनुदान देण्यात यावे, या निधीतून ट्रॅक्टर खरेदीसाठी अनुदान अनुज्ञेय असणार नाही.
३. सदर प्रकल्पाची अंमलबजावणी महाडीबीटी पोर्टलवर करावी.

४. लाभार्थ्यांकडून अर्ज महाडीबीटी पोर्टलवर स्विकारुन ऑनलाईन सोडतीद्वारे लाभार्थ्यांची निवड करावी.
५. लाभार्थी निवडीची प्रत्यक्ष प्रक्रीया RKVY-RAFTAR अंतर्गत निधी उपलब्धतेनंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत करावी.
६. प्रकल्पांतर्गत देण्यात येणाऱ्या यंत्र/अवजारांचे Geo tagging करावे.
७. अनुदानाची रक्कम महाडीबीटी पोर्टलवरुन डीबीटी द्वारे PFMS बँक खात्यातून अदा करण्यात येत असल्याची खात्री आयुक्त (कृषी) यांनी करावी.
८. लाभधारकाचा आधार क्रमांक अभिलेख्यामध्ये नमूद करावा .
९. लाभधारकाचे स्थान (location) नमूद करावे.
१०. RKVY-RAFTAR मधून कृषी यांत्रिकीकरण प्रकल्पासाठी उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या निधीमधून क्षेत्रिय स्तरावर कार्यक्रमाच्या अंमलबजावणीची कार्यपद्धती आयुक्त (कृषी) यांनी विहीत करुन सर्व क्षेत्रिय अधिकाऱ्यांना कळवावी.
११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९०८१७५९५७३७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2021.09.08 18:01:00 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. संचालक ( विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,पुणे
३. संचालक ( निविष्ठा व गुण नियंत्रण), कृषि आयुक्तालय,पुणे
४. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. सर्व संचालक / सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
६. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
७. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
८. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर (लेखा परिक्षा) /(लेखा व अनुज्ञेयता)
९. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखापरिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०
१०. माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
११. नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२

१२. वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२

१३.मा. राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव

१४.मा. मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव

१५.निवड नस्ती (कार्यासन -१४अे).